प्रादेशिक मनोरुग्णालय ठाणे येथील
सिमाभिंत बांधकामाच्या च्या अंदाजपत्रक व
आराखडयास प्रशासकीय मान्यता
देण्याबाबत.

## महाराष्ट्र शासन

### सार्वजनिक आरोग्य विभाग

### शासन निर्णय क्रमांकः प्रशामा २०१५/प्रक्र-४२४/आरोग्य ३(अ)

गो.ते.रुग्णालय संकुल इमारत,१० वा मजला,मंत्रालय,

मुंबई- ४००००१.

दिनांक: २८ ऑक्टोबर,२०१६.

**वाचा -**

१) संचालक,आरोग्य सेवा , मुंबई यांचा प्रस्ताव क्र. संआसे/ माआ/टे-३/सिमाभिंत बांधकाम /१८३५/१५, दि. ३० /१२ /२०१४

२) शासकीय इमारतीच्या बांधकामाना मंजुरी देण्यासाठी दि. १०/०३/२०१६ रोजी पार पडलेली सचिव समितीची बैठक.

**संदर्भ :- समक्रमांक दि.१६ एप्रिल,२०१६ चा शासन निर्णय.**

**प्रस्तावना**

संदर्भाधीन क्र. १ च्या पत्रान्वये प्रादेशिक मनोरुग्णालय , ठाणे येथील सिमाभिंत बांधकामासाठीचे रु. ४, ९७,२४,९०६/- (चार कोटी सत्त्याण्णव लक्ष चोवीस हजार नऊशे सहा ) इतक्या रकमेचे अंदाजपत्रक व आराखडे आरोग्य सेवा संचालनालयाव्दारे शासनास सादर करण्यात आले होते . सदर प्रस्ताव सचिव समितीच्या मान्यतेस्तव सादर केला असता सचिव समितीने या कामासाठी

रु.५ कोटी ४५ लाख ६ हजार इतक्या किंमतीच्या सुधारीत अंदाजपत्रकास प्रशासकीय मान्यता देण्यास सहमती दर्शविली आहे.

त्यास अनुसरुन प्रादेशिक मनोरुग्णालय, ठाणे येथील सिमाभिंत बांधकामासाठीच्या रु.५ कोटी ४५ लाख ६ हजार इतक्या रकमेच्या सुधारीत अंदाजपत्रक व आराखडयांना प्रशासकीय मान्यता देण्याचे शासनाच्या विचाराधीन होते. त्यानुषंगाने निर्गमित करण्यात आलेला संदर्भांकित शासन निर्णय रद्द करण्यात येत असून, सुधारित शासन निर्णय खालीलप्रमाणे आहे :-

## शासन निर्णय-

प्रादेशिक मनोरुग्णालय, ठाणे येथील सिमाभिंत बांधकामासाठी रु.५,४५,०६,०००/- (पाच कोटी पंचेचाळीस लक्ष सहा हजार ) इतक्या रकमेच्या सुधारीत अंदाजपत्रक व आराखडयांस या शासन निर्णयान्वये प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

कामाचा वाव खालीलप्रमाणे आहे.

| Sr.No. | Work ( Construction of compound wall) | Amount |
|---|---|---|
| 1 | **Near servant quarter portion** | Rs. 62,49,990/- |
| 2 | **Nalla Portion near Dnyansadhana College side** | Rs. 63,44,525/- |
| 3 | **North side near A.C.C. Company** | **Rs.2,70,89,700/-** |
| 3 | **North side near A.C.C. Company to 32 nurse quarter** | **Rs.67,36,170/-** |
| 4 | Near Railway side | **Rs.63,58,030/-** |
| 5 | Near Servant Quarter Portion | **Rs.63,58,030/-** |
| 6 | Near Servant Quarter Portion | **Rs.61,55,455/-** |
| 7 | Near Banjara Vasti | **Rs.29,00,750/-** |
| | **Sub Total** | **Rs. 4,78,12,110/-/-** |
| | **Contigencies (4 %)** | **Rs. 1912484/-** |
| | **Price Escalation (10%)** | **Rs. 47,81,211/-** |
| | **Total** | **Rs.5,45,05,805/-** |

**अटी व शर्ती**

अ) काम सुरु करण्यापूर्वी सदर अंदाजपत्रक सा.बां.विभागाचे संबधित मुख्य अभियंता यांच्याकडून साक्षांकित करुन घ्यावे.

ब) काम सुरु करण्यापूर्वी जागेच्या मालकी हक्काबाबतची पूर्तता करुन घ्यावी.

क) कामासाठीच्या जागेची उपलब्धता , योग्यता व जागा पुरेशी आहे किंवा नाही याबाबतची खात्री आरोग्य संस्था प्रमुख यांनी करावी.

ड) सदरचे अंदाजपत्रक हे ढोबळ नमुना अंदाजपत्रक असल्याने या कामाच्या सविस्तर अंदाजपत्रकांना तांत्रिकदृष्टया मान्यता ही सार्वजनिक बांधकाम खात्याच्या त्या- त्या क्षेत्राच्या सक्षम अधिका-याकडून करण्यात यावी. अशी तांत्रिक मान्यता करीत असताना आरोग्य खात्याच्या त्या त्या आरोग्य सेवा मंडळाच्या उपसंचालकांच्या सहमतीने तरतूदी अंतीम करण्यात याव्यात.

इ) प्रत्यक्ष काम करतेवेळी पर्यावरण विभाग , शासन निर्णय क्र. इएनव्ही- २०१३ / प्र.क्र. १७७/ तां.क. १ दि. १० जानेवारी २०१४ मध्ये उल्लेख करण्यात आलेल्या मार्गदर्शक तत्वानुसार कार्यवाही करण्यात यावी.

सदर बांधकामावरील खर्च खालील लेखाशिर्षाखाली दर्शविण्यात यावा.

**लेखाशिर्ष**:-

४२१०- वैद्यकीय सेवा व सार्वजनिक आरोग्य यावरील भांडवली खर्च

०१- नागरी आरोग्य सेवा (वैद्यकीय सहाय्य)

११० - रुग्णालये व दवाखाने

(१)(अ) पंचवार्षिक योजनांतर्गत योजना-इमारती

(००) (०१)- मोठी बांधकामे **(४२१० ००१४)**

**५३ - मोठी बांधकामे.**

हे आदेश सार्वजनिक बांधकाम विभागाच्या अनौपचारीक संदर्भ क्र. अनौप ५ /२०१६ इमा -३ दि.०६/०१/ २०१६ अन्वये प्राप्त सहमतीने तसेच शासकीय इमारतीच्या बांधकामाना मंजुरी देण्यासाठी दि. १०/०३/२०१६ रोजी झालेल्या सचिव समितीच्या बैठकीत दिलेल्या निर्णयास अनुसरुन आणि वित्त विभागाचा शासन निर्णय- विअप्र २०१३ /प्र.क्र. ३०/ २०१३ विनीयम भाग-२ दि. १७/०४/२०१५ सोबतच्या परिशिष्ट भाग - पहिला उपविभाग - पाच मधील अनुक्रमांक -१ परिच्छेद क्र. १३४ अन्वये प्रशासकीय विभागांना प्रदान करण्यात आलेल्या अधिकारान्वये निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१६१०२८१५५८५८००१७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Vivek Rambhaji Dahiphale

Digitally signed by Vivek Rambhaji Dahiphale
DN: CN = Vivek Rambhaji Dahiphale, C = IN, S = Maharashtra, O = Government Of Maharashtra, OU = Public Health Dept
Date: 2016.10.28 19:02:09 +05'30'

**(विवेक दहिफळे)**

सहसचिव, महाराष्ट्र शासन

प्रत,

संचालक ,आरोग्य सेवा, मुंबई.

अति. संचालक रुग्णालये (राज्यस्तर) आरोग्य सेवा, मुंबई.

उपसंचालक , आरोग्य सेवा, मुंबई मंडळ, ठाणे.

वैद्यकीय अधिक्षक, प्रादेशिक मनोरुग्णालय ठाणे .

मुख्य अभियंता, सा.बां . प्रादेशिक विभाग, मुंबई .

महालेखापाल१/२ महाराष्ट्र( लेखा व लेखापरिक्षा )/ (लेखा व अनुज्ञेयता), मुंबई/ नागपुर.

वित्त विभाग, (विनीयम कार्यासन / कोषा -५ /अर्थसंकल्प) मुंबई.

अवर सचिव (अर्थसंकल्प) सार्वजनिक आरोग्य विभाग, मंत्रालय , मुंबई.

निवडनस्ती.